ई साहित्य प्रकाशन

२४ - ८ - २००९ अंक क्र- ४१



# गुलदस्ता

संपादक –
सोनाली घाटपांडे (पुणे)
भारती सरमळकर (मुंबई)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
सारंग भणगे (पुणे)
सचिन काकडे (मुंबई)
अहं ब्रह्मास्मि (पुणे)

## या अंकात वाचा



हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

netaksharee@gmail.com

www.netaksharee.com



**गणेशोत्सवाच्या सर्वांना नेटाक्षरीतर्फे हार्दीक शुभेच्छा !!**
**बाप्पा मोरया !**

या अंकात घेऊन आलोय खास तुमच्यासाठी हा फुलांचा 'गुलदस्ता' ज्यात आहेत विविधरंगी सुगंधी फुलं ! ह्याचा आनंद भरभरून घ्या आणि इतरांनाही द्या!



'हल्के हल्के रंग छलके ........' कवीच मनही असचं, शब्दांचे शिडकावे सहजपणे कागदावर उतरवत. रंगतो मग शब्द-चित्राचा खेळ अन मग जे चित्र उमटत ते **'प्रणव मराठे'** यांच्या शब्दात जाणून घेऊया !

**स्फुरलचं जर काही !!**

स्फुरलच जर काही
मनसोक्त लिहावं,
अंतरीच्या भावनांना
हळूवार उलगडावं

खळखळणा-या झ-यासारखं
चमचमणा-या तळयासारखं,
हे विश्व भावनांचं
नात्यांमध्ये बुडलेलं

व्यक्तीगणीक बदललेलं
स्वभावांनी नटलेलं,
वर्णन भावनांचं
अगदी अवर्णनीय

विस्तारलेल जग यांचं
शब्दांनी कस जोडावं,
समजून घ्याव थोड तिनं
हलकेच लेखणीतून उतरावं

- **प्रणव मराठे**





मित्रांनो हे **'योगेश जोशी'** जर निवडणूकीला उभे राहीले तर १००% निवडून येतील पहा ............... अरे! असे का म्हणून काय विचारता ? त्यांची कविता वाचा जरा म्हणजे समजेलच !

**इलेक्शन**

इलेक्शन (काय फरक पडतो ? कोणाला ?)

बाबूच्या दोन्ही रिक्षा, प्राथमिक शाळेपर्यंतच्या
शेवटच्या फेरीनंतर एकदाच्या शांत झाल्यावरं

झम्मूचाचाची नमाजासाठी चूळ भरण्याआधीची
३२० किमामची शेवटची पिंक पडण्यावेळी
गेले वीस दिवस पायाला भींगरी आणि मनाला आकडेमोड लावून घेतलेल्या
सोपानभाऊंनी चहाच्या अजून एका कपाला हात लावला.

आणी मग त्यांच्या शेजारच्या घरातल्या कमलाकाकूंनी
साखरेच्या डब्याखालची नोट तिथून काढून ट्रंकेत नेऊन ठेवली

सुरक्या आणी छोटा पिल्या मात्र नुसतेच सगळया पताकांची
विमान करत गल्लीत हिंडत होतं

खोलीतल्या संगीताने जरी मग अजूनही छान लालभडक असलेल्यां
आपल्या नेलपेंटच्या दहाही बोटांकडे पुन्हापुन्हा निरखून पाहिलं

तरीही तिथून दोनच किलोमीटर अंतरावरच्या आमदार निवासातं
जागरणाचे लाल डोळे आणि सुकलेल्या घशाचे कढ़ घेऊन
पोटातला गोळा पुन्हा पुन्हा परतवत दिल्लीला फोन लावणा-या
साहेबांची मनस्थिती तिला कळणे शक्य नव्हते

सायंकाळी सहा वाजताच्या त्या सूर्यअस्ताला जाणा-या वेळी
आपला खोकला संभाळतं
कशाचही काही नसल्यासारखी
अवेळी
शांत झोपली होती माझी आजी

आणि तशीच माझ्या महान देशातली महान लोकशाही सुध्दा !

**- योगेश ज. जोशी**



दोस्तांनो ! चला आता लावणी वाचायला, लोक लावणी बघतात, ऐकतात आम्ही तर ती वाचतो ...........थांबा लगेच फेटे आणायला नका धावू, कारण ही लावणी आहे माघ महिन्याची ...........

## माघ महिना थंडीचा



माघ महिना थंडीचा
अन पावनं गुलाबी बंडीचा

धुक्याच्या या महालात
चलाव ज्वालाज्वालात
अंगा हुड-हुड म्हनतयं
धरा पदर या शेकोटीचा

पावनं ....
माघ महिना थंडीचा
अन पावनं गुलाबी बंडीचा

चाय आल्याचा सुंठ न साखर
सारा बाजूला थंडीची चादर
शेक घेऊ चला
कवल्या उन्हाचा

पावनं ....
माघ महिना थंडीचा
अन पावनं गुलाबी बंडीचा

पडस झालय खो खो करतायं
दवा-दारू वरवर घेतायं
उब येईल हिकड याना
हा इलाज गरमाईचा

पावनं ....
माघ महिना थंडीचा
अन पावनं गुलाबी बंडीचा

माघ महिना थंडीचा
अन पावनं गुलाबी बंडीचा

**- पियूष नाशिककर**



‘सखा’ मनाला ......हृदयाला पडलेल गारूड......सखा हा कोणत्याही रूपात असो पण त्याच्याशी संवादाचा मोह अगदी राधा, मीरा यांनाही सोडवला नाही. अशा मनमोहन, मित्र, प्रियतम सख्याशी साधलेला संवाद

**तू सख्या**

चांदणे हे, टिपूर आकाशी
अशा या रात्री, तू सख्या यावे

आस ही जागते, उफाळूनी
मज समेटून, तू सख्या यावे

स्वर हा अंतरी, झंकार तुझा
साज छेडूनी, तू सख्या यावे

बरसुनी घाल साद, आतुर मी
अंगणी चिंब, तू सख्या यावे

जाहला खेळ, आयुष्याचा रे
डाव मांडून, तू सख्या यावे

श्वास माझा, सरेल रे जेव्हा
स्पंदने होऊन, तू सख्या यावे

- **चांदनी (निशा)**



स्पर्श तुझा मोरपिसारी
सर्वांगावरून फिरव पुन्हा
घेऊनी कवेत मजला
घडूदे तो नाजूक गुन्हा

भिडू दे ओठाला ओठ
कर ना भलता हट्ट
चढ़व मैफलीला साज नवा
प्रणयाचा तो खेळ जुना

परत एकदा होऊन तान्हा
चाखून घे तो उष्ण पान्हा
रोमांचित करूनी तनुला
राधेचा तो बनुनी कान्हा

मग अचानक,
स्वप्नातून मी जागी होता
कुसही माझी रितीच दिसता
बंड करूनी उठते काया
गातची बसते राग सुना

- **पल्लवी उन्हाळे (पृथा)**



ऐकवतो तुम्हाला आज कृष्णेची आरती , तिची स्तुती . नदी ही देवता,
जीवनदायीनी आपल्या जवळचे सर्व भरभरून देणा-या कृष्णामाईची
स्तुती लिहिली आहे उपेंद्र चिंचोरे यांनी



## कृष्णामाई

कृष्णामाई मनास मोही,
स्तुतीस्तवन तुझे ।
गणेश करतो श्रीगणेशा
लिहूनी कवन तुझे ।।१।।

अगाध महिमा ऐसा तुझा गे,
अजोड ती महती ।
स्वयं गणेशा , रामदासांची
लिहीतो ही आरती ।।२।।

नयनांमध्ये साठवली मी,
मूर्त तुझी देखणी ।
कुरूकुरू कोरे सुबक अक्षरे,
गणेशाची लेखणी ।।३।।

गातो मंगल तुझी आरती,
आणि यशोगाथा ।
देवगणांच्या चरणी ठेवी,
उपेंद्र निजमाथा ।।४।।

- **उपेंद्र चिंचोरे**



आमचं वय झाल तर त्यात काय? अभी तो हम दिलसे जवान है ।
अबोलीच्या कवितेतील जोडप्याला हेच तर नाही न सांगायच?



## रेड रोझ

आज पुन्हा एकदा गजरा माळला
अन नव्याने तयार झाले
अंगावर लाल चुटूक सिल्क साडी
अन केसांवर काळा कलप
आठवणींचा सुगंध परत अंगावर झुळझुळला

ऒठा अन गालावरती जाळ सुरकुत्यांचं
पण आठवणीच्या राज्यात राज्य रानफुलांच

परत भेटायच ठरवल आम्ही दोघांनी
या सिमेंट कॉंक्रीटच्या रानातं
फरक एवढ़ाच
की परत आला तो क्षण ३०-३५ वर्षांनी

भेटा तिथेच वाट पण ओळखीचीच
मात्र मनात शम्मीकपूरचाच नाच

कुत्सित नजरा, जळजळीत कटाक्ष
वय उलटल पण म्हातारचळ नाही गेलं
त्यांना काय माहित
उघडलय माझ्या तरूण आठवणींच गवाक्ष

तोही आला अंगात नरिंगी पांढरा बुशशर्ट घालून
छप्पर उडाल होतं
पण डॊळयातला नूर मात्र तोच
सखे हे तुझ्यासाठीच
हातात होत त्याच्या रेड रोझ

- **अबोली**

‘जीवनाच तत्वज्ञान’ किती अवजड बोजड शब्द वाटतोय ना? पणा हेच सोपं करून सांगत आहेत ‘परमानंद सावंत’



**कल**

याद ना कर तू कल को इतना
की वो आज पे हावी हो जाए
खिली है जिंदगी तेरे सामने
दिख पाए जो कम आखोंकी नमी हो जाये

मौका दे अपने मुक्कदर को सवारने जिंदगी
संभाल की तकदीर रूसवा कही न हो जाए
आस लगाए बैठे है तेरे अपने
तू जो शामील उनकी खुशी मे हो जाए

महदुद ना रख मुराद को
ख्वाहीशे तेरी एकबाल हो जाए
रख हौसला अपनी नेकी पे
तो उपरवाला भी तेरे साथ हो जाए

- **परमानंद सावंत**

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ४०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**netaksharee@gmail.com**